**पंचायत समिती आमसभेच्या मा. मंत्री,**
**मा. राज्यमंत्री यांच्या अध्यक्षपदाबाबत**

**महाराष्ट्र शासन**
ग्राम विकास व जलसंधारण विभाग
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
**शासन परिपत्रक क्रमांक : झेडपीए २०१०/प्र.क्र.१९०/पंरा-१**
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- ९ डिसेंबर, २०११

वाचा :- १) शासन परिपत्रक ग्राम विकास व जलसंधारण विभाग क्रमांक : जिपआ १०९८/प्र.क्र. १५५/०५, दिनांक ५ नोव्हेंबर, १९९८
२) शासन परिपत्रक ग्राम विकास व जलसंधारण विभाग क्रमांक : झेडपीए २०१०/सं.क्र.८५१/प्र.क्र.१७४/पंरा-१, दिनांक २९ सप्टेंबर,२०११

परिपत्रक :-

राज्यातील पंचायत समिती क्षेत्रात एकापेक्षा जास्त विधानसभा सदस्य असतील व त्यापैकी जे विधानसभा सदस्य मा. मंत्री / मा. राज्यमंत्री असतील व ज्यांचे त्या पंचायत समिती क्षेत्रातील मतदाराची संख्या इतर विधानसभा सदस्यापेक्षा कमी असेल अशावेळी आमसभेचे अध्यक्षपद कोणी भूषवावे याबाबत जिल्हा परिषदांकडून शासनाकडे मार्गदर्शन मिळण्यासाठी विचारणा होत आहे.

२. त्या अनुषंगाने नमूद करण्यात येते की, सर्वसाधारण धोरण म्हणून विधानसभा सदस्य जे मा. मंत्री / मा. राज्यमंत्री असतील व त्यांच्या मतदारांची संख्या अशा पंचायत समिती क्षेत्रातील इतर विधानसभा सदस्यांच्या मतदारांच्या संख्येपेक्षा जरी कमी असली तरी सुध्दा त्या पंचायत समितीच्या आमसभेचे अध्यक्षपद त्या विधानसभा क्षेत्रातील मा.मंत्री / मा.राज्यमंत्री यांना देण्यात यावे.

३. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आले असून त्यांचा संगणक संकेतांक २०१११२०९१०७०७५४००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

(डॉ. मल्लीनाथ कलशेट्टी)
उप सचिव, महाराष्ट्र शासन.

(कृ.मा.प.)

F:\Dattatray choragheCR 174 (2011)

प्रति,

१. मा. राज्यपाल यांचे सचिव

२. मा. मुख्यमंत्री यांचे सचिव

३. मा. उपमुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव

४. मा. मंत्री / राज्यमंत्री (सर्व) यांचे स्वीय सहाय्यक

५. मा. अध्यक्ष जिल्हा परिषद (सर्व) (मु. का. अ. जि.प. मार्फत)

६. मा. विधानसभा / मा. विधानपरिषद सदस्य (सर्व)

७. मा. मुख्य सचिव यांचे स्वीय सहाय्यक

८. मा. अपर मुख्य सचिव /मा. प्रधान सचिव / मा. सचिव (सर्व मंत्रालयीन विभाग)

९. विभागीय आयुक्त (सर्व)

१०. जिल्हाधिकारी (सर्व)

११. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)

१२. निवड नस्ती, कार्यासन क्रमांक पंरा -१, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई